विक्रीकर विभागामार्फत "ई-कर" भरणा
सुविधा सुरु करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : व्यकर-१०११/प्र.क्र.५६/कराधान-३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ८ डिसेंबर, २०११

**संदर्भ :-** वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विकअ २००९/प्र.क्र.८८/कराधान-२,
दिनांक २ जानेवारी २०१०.

**प्रस्तावना :**

"ई-गव्हर्नन्स" प्रणालीची अंमलबजावणी करण्यासाठी, महाराष्ट्र शासनाने विक्रीकर विभागामार्फत ई-विवरणपत्रे, ई-नोंदणी तसेच ई-लेखा अहवाल इत्यादि सुविधा व्यापारी वर्गास उपलब्ध करुन दिल्या आहेत. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये महाराष्ट्र मूल्यवर्धित कर अधिनियम, २००२ आणि केंद्रीय विक्रीकर अधिनियम, १९५६ या कायदयांतर्गत भरण्यात येणाऱ्या रकमांसाठी ई-कर सुविधा उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. याच धर्तीवर विक्रीकर विभागातर्फे राबविल्या जाणाऱ्या विविध कायद्यांतर्गत कर व करेतर रक्कमेचा भरणा नोंदित व्यापारी, व्यावसायिक, मालक, व्यक्ती, ऊस गाळप करणारे कारखाने तसेच हॉटेल्स इत्यादिंनी संगणकीय प्रणालीमार्फत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

विक्रीकर विभागातर्फे महाराष्ट्र मूल्यवर्धित कर अधिनियम २००२ व केंद्रीय विक्रीकर अधिनियम १९५६ व्यतिरिक्त खालील कायदे राबविले जातात :-

१) महाराष्ट्र राज्य, व्यवसाय, व्यापार, आजिविका आणि नोकऱ्या यावरील कर अधिनियम, १९७५;
२) महाराष्ट्र ऐषआराम सेवांवरील कर अधिनियम, १९८७;
३) महाराष्ट्र ऊस खरेदीकर अधिनियम, १९६२;
४) महाराष्ट्र स्थानिक क्षेत्रात मोटार वाहनाच्या प्रवेशावरील कर अधिनियम, १९८७;
५) महाराष्ट्र स्थानिक क्षेत्रात मालाच्या प्रवेशावरील कर अधिनियम, २००२;
६) केंद्रीय चिटफंड अधिनियम, १९८२;

उपरोक्त कायदयांतर्गत कर व करेतर महसूलाचा भरणा नोंदित व्यापारी, व्यावसायिक, मालक व व्यक्तींना संगणकीय प्रणालीद्वारे करण्याची सुविधा शासन उपलब्ध करुन देत आहे. त्यासाठी नोंदित व्यापारी, व्यावसायिक, मालक, व्यक्ती, ऊस गाळप करणारे कारखाने तसेच हॉटेल्स इत्यादिंनी महाराष्ट्र कोषागार नियम, ११२ अनुसार विहित करण्यात आलेल्या नमुना क्रमांक ६ "ई-कर" भरणा करण्यासाठी वापरावा. या सुविधेमध्ये खालील बाबी अंतर्भूत असतील.

(१)प्रस्तुत ई-कर भरणा प्रक्रियेमध्ये समाविष्ट असलेल्या प्रत्येक बँकेस आपली एक शाखा मुंबई मध्ये 'समन्वयक बँक शाखा' (Nodal Branch) म्हणून घोषित करणे अनिवार्य असेल.

(२)प्रत्येक बँकेने घोषित केलेल्या समन्वयक बँकेस भारतीय रिझर्व्ह बँकेची ई-पेमेंट प्रक्रियेमध्ये समाविष्ट होण्यासाठी पूर्व परवानगी घेणे अनिवार्य असेल.

(३) भारतीय रिझर्व्ह बँकेच्या निर्देशानुसार प्रस्तुत समन्वयक बँकेने प्रत्येक दिवशीचा कर भरणा टी + १ या कालावधीत रिझर्व्ह बँकेत जमा करावा. ज्यामध्ये "टी" म्हणजे ज्या तारखेला समन्वयक बँकेला कर भरणा प्राप्त झाला तो दिनांक. वरील प्रमाणे समय मर्यादेचे बंधन समन्वयक बँकेने न पाळल्यास त्यासाठी दंडात्मक व्याज लादण्याचे अधिकार अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना देण्यात आलेले आहेत. तथापि, सदर ई-कर भरणा सुविधा सुरु झाल्यापासून पहिल्या तीन महिन्योसाठी टी+४ या कालावधीमध्ये भरणा केल्यास व्याजाची आकारणी करण्यात येणार नाही. म्हणजेच या व्याज आकारणीमध्ये टी+४ या दिवसांचा, (put through date) समावेश रहाणार नाही. परंतु टी+४ या कालावधीनंतर व्याजाची आकारणी करण्यात येईल. याप्रमाणे करावयाच्या व्याज आकारणीसंदर्भात विक्रीकर विभागाने कोषागारांना माहिती दयावी व त्यानुसार कोषागारांनी संबंधित बँकेकडून व्याजाची वसुली करुन महालेखापाल कार्यालय, रिझर्व्ह बँक व शासनास कळवावे.

(४) समन्वयक बँकेने भारतीय रिझर्व्ह बँकेत विक्रीकर विभागातर्फे राबविल्या जाणाऱ्या विविध कायद्यांतर्गत कर व करेतर रक्कमेचा भरणा केल्यानंतर त्याबाबतच्या प्रत्येक अधिनियमांतर्गत प्राप्त होणाऱ्या रक्कमेचा "ई-पेमेंट स्क्रोल" विक्रीकर विभागाच्या संकेतस्थळावर अपलोड करावा. या स्क्रोल प्रमाणे एकूण जमा महसूल हा भारतीय रिझर्व्ह बँकेकडे वर्ग करण्यात येणाऱ्या रकमे इतकाच असावा.

(५) ई-पेमेंट गेट वे मार्फत जमा होणाऱ्या रकमेची पावती म्हणून एमटीआर-६ (MTR-6) नमुन्यात चलन मुद्रीत (generate) करणे आवश्यक राहील. तसेच सदर चलन ऑनलाईन पाहण्यासाठी/ छपाईसाठी/ डाऊनलोडसाठी उपलब्ध करुन देणे प्रस्तुत बँकेस अनिवार्य असेल.

(६)समन्वय बँकेने "ई-पेमेंट स्क्रोलची" मुद्रीत प्रत, तसेच त्याबाबत इतर आवश्यक ते दस्ताऐवज भारतीय रिझर्व्ह बँकेस पाठविणे आवश्यक राहील. भारतीय रिझर्व्ह बँक समन्वयक बँकेकडून प्राप्त "ई-पेमेंट स्क्रोलच्या" मुद्रीत प्रती पुढील कार्यवाहीकरिता आपल्या स्क्रोल बरोबर अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना पाठवतील. इलेक्ट्रॉनिक पध्दतीने "ई-कर भरणा (e-payment)" जमा होणाऱ्या रकमेचा स्वतंत्र तपशील भारतीय रिझर्व्ह बँकेने अधिदान व लेखा कार्यालयास पाठविणे आवश्यक राहील.

(७)अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई हे ई-पेमेंटद्वारे शासनास वरील प्रमाणे प्राप्त झालेल्या रकमांचे लेखांकन सदर स्क्रोलच्या आधारे प्रचलित कायद्यातील तरतुदीनुसार करतील.

(८)अधिदान व लेखा कार्यालयाकडून महालेखापालांकडे सादर होणाऱ्या मासिक लेख्यांमध्ये विक्रीकर विभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या विविध कायद्यांतर्गत जमा रकमेच्या माहितीचा समावेश असेल.

(९)विक्रीकर विभागाने अधिदान व लेखा कार्यालयाबरोबर जमेचा मासिक मेळ घेणे आवश्यक राहील. विक्रीकर विभागाने अधिदान व लेखा कार्यालयाबरोबर जमेचा मासिक मेळ घेण्यासाठी महाराष्ट्र कोषागार नियम पुस्तिकेमधील (MTM) प्र.क्र.सहा, नियम ४२८ नुसार महिनाअखेर होताच जमा रकमांची यादी दोन प्रतीत तयार करुन अधिदान व लेखा कार्यालयाकडे सादर करुन ती अधिदान व लेखा कार्यालयाकडून महाराष्ट्र कोषागार नियम पुस्तिकेतील नियम ४२९ नुसार प्रमाणित करुन घेण्यात यावी.

(१०)ई-कर भरणा करण्याची कार्यपध्दती विक्रीकर विभागाकडून परिपत्रकाद्वारे जाहीर करण्यात येईल. तसेच कोणत्या कायदयांतर्गत कोणत्या करदात्यांना व कोणत्या दिनांकापासून ई-कर भरणा (e-payment) अत्यावश्यक किंवा वैकल्पिक असेल यासंबंधीची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात वेळोवेळी प्रसिध्द करेल.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासन www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११२०८०७११५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

भांगडीया
८।१२।११

( ओ.चै.भांगडीया )

उप सचिव, वित्त विभाग

**प्रति,**

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई (२०प्रती),
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
३. महालेखापाल, (लेखा परिक्षा) २, महाराष्ट्र,मुंबई,
४. भारतीय रिझर्व्ह बँक, मुख्य इमारत फोर्ट, मुंबई,
५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. ग्रंथपाल आणि संशोधन अधिकारी (ग्रंथालय), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन मुंबई,
१०. निवड नस्ती, कराधान-१,२,३.

प्रत माहितीसाठी अग्रेषित

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (सर्व)
४. मा.राज्यमंत्री (सर्व)
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.